उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/ संस्थेमधील ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांच्या बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.८७/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १८ जुलै, २०२३.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ४(४) (दोन) मधील तरतूदीनुसार, बदली करण्यास सक्षम असलेल्या वरिष्ठ प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थामधील ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक (गट-अ) पदावरील खालील अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे. :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालय/ संस्था | बदलीनंतरचे महाविद्यालय/ संथा | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | डॉ.रामदास लिहितकर, ग्रंथपाल | शासकीय अध्यापक महाविद्यालय, रत्नागिरी | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | विनंतीनुसार |
| २. | डॉ.श्रीमती वंदना अंभोरे,ग्रंथपाल | शासकीय अध्यापक महाविद्यालय, औरंगाबाद. | शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई | प्रशासकीय |
| ३. | डॉ.सुनिल दादाराव पुनवटकर, ग्रंथपाल | शासकीय विज्ञान महाविद्यालय, गडचिरोली | वसंतराव नाईक शासकीय कला व समाज विज्ञान संस्था, नागपूर | विनंतीनुसार |
| ४. | डॉ.काशिनाथ अंबादास मस्के, शारिरीक शिक्षण संचालक | शासकीय अध्यापक महाविद्यालय, रत्नागिरी | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती. | विनंतीनुसार |

२. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी बदली झालेल्या ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांनी सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या महाविद्यालयात/ संस्थेत तात्काळ रुजू व्हावे.

३. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी बदली झालेले ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांना संबंधित महाविद्यालय/संस्थेमधून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी रुजू होण्यासाठी आलेल्या ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांना रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षा काळ ठरवून काम न करता वेतन व भत्ते देण्याच प्रसंग उद्भवल्यास संबंधित प्राचार्य/संचालक यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच, संबंधित ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक यांना कार्यमुक्त झाल्यापासून बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदली आदेशाबाबतचा कार्यपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी तात्काळ शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०७१८१७३४२८४६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2023.07.18 17:57:21 +05'30'

**( अशोक मांडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचाल,उच्च शिक्षण.
३. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित ग्रंथपाल व शारिरीक शिक्षण संचालक ( कार्यालय प्रमुखामार्फत)
८. निवड नस्ती ( मशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२